**राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना व इतरांना वाहतूक भत्ता मंजूर करणेबाबत**

# महाराष्ट्र शासन

## वित्त विभाग

शासन निर्णय, क्रमांक वाहभ-१०९८/प्र. क्र. ८३/९८/सेवा-५,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १४ डिसेंबर १९९८.

**पहा.**—(१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक टीआरए-१३७९/प्र. क्र. १७३७/सेवा-५, दिनांक २० फेब्रुवारी १९८०.

(२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक टीआरए-१०८३/प्र. क्र. १३७५/सेवा-५, दिनांक ४ जानेवारी १९८४.

(३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक टीआरए-१३८३/प्र. क्र. १४५४/सेवा-५, दिनांक १० जानेवारी १९८४.

(४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विवाभ-१३८८/प्र. क्र. ६८०/सेवा-५, दिनांक ८ मार्च १९८९.

(५) केंद्र शासन, वित्त मंत्रालय, व्यय विभाग यांचे कार्यालयीन ज्ञापन क्र. २१ (१) ९७/इ-दोन (बी), दिनांक ३ ऑक्टोबर १९९७.

## शासन निर्णय

केंद्र शासनाने आपल्या कर्मचाऱ्यांना उपरोल्लिखित अनुक्रमांक ५ येथील आदेशानुसार निवासस्थानापासून कर्तव्य स्थानापर्यंतच्या प्रवासावरील खर्चाची भरपाई म्हणून वाहतूक भत्ता (Transport Allowance) मंजूर केला आहे. केंद्र शासनाच्या धर्तीवर राज्य शासकीय कर्मचारी व इतर यांना वाहतूक भत्ता मंजूर करण्याचा प्रश्न शासनाच्या काही काळ विचाराधीन होता. शासन आता असे आदेश देत आहे की, **दिनांक १ ऑक्टोबर १९९८ पासून** राज्य शासकीय कर्मचारी व इतर यांना वाहतूक भत्ता खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे मंजूर करण्यात यावा.

**तक्ता**

| अनुक्रमांक | कर्मचाऱ्याची वेतनश्रेणी | दरमहा वाहतूक भत्त्याचा दर (रुपये) | |
|---|---|---|---|
| | | " अ-१" आणि " अ " वर्ग शहरे | इतर ठिकाणे |
| १ | रु. ८०००—१३५०० किंवा त्याहून वरच्या वेतनश्रेणीमध्ये वेतन घेणारे कर्मचारी. . . | ८०० | ४०० |
| २ | रु. ६५००—१०५०० किंवा त्याहून वरच्या परंतु रु. ८०००—१३५०० पेक्षा खालच्या वेतनश्रेणीमध्ये वेतन घेणारे कर्मचारी. . . | ४०० | २०० |
| ३ | रु. ६५००—१०५०० पेक्षा खालच्या वेतनश्रेणीमध्ये वेतन घेणारे कर्मचारी. . . | १०० | ७५ |

२. ह्या आदेशातील वाहतूक भत्त्याचे प्रदान खालील अटींच्या अधिन आणि त्यानुसार विनियमित करण्यात येईल.

(एक) या आदेशांमध्ये नमूद केलेली " अ-१ " आणि " अ " शहरे, स्थानिक पूरक भत्त्याच्या प्रयोजनार्थ केलेल्या शहरांच्या वर्गीकरणाप्रमाणे राहतील.

(G.C.P.) H2121-16000-12-98

(दोन) कर्तव्य स्थानापासून एक किलोमीटर अंतराच्या आत किंवा कर्तव्यस्थान आणि निवासस्थान ह्यांच्या एकत्र परिसरात (Campus) शासकीय निवासस्थान पुरविण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांना हा भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

**टीप.**––ह्या आदेशांतील भत्त्याचे प्रदान, संबंधित कर्मचाऱ्याने, त्याला पुरविण्यात आलेले शासकीय निवासस्थान, कर्तव्य स्थानापासून एक किलोमीटर अंतराच्या आत किंवा कर्तव्यस्थान आणि निवासस्थान यांच्या एकत्र परिसरात (Campus) नाही अशा आशयाचे प्रमाणपत्र देण्याच्या अधिन राहून करण्यात येईल.

(तीन) ज्या कर्मचाऱ्यांना शासकीय वाहतूक सुविधा (Government Transport) पुरविण्यात आली आहे त्यांना हा भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

(चार) ज्या कर्मचाऱ्यांनी असुधारित वेतनश्रेणीत वेतन घेण्याचा विकल्प दिलेला आहे अशांच्या बाबतीत त्यांनी जर सुधारित वेतनश्रेणी स्वीकारण्याबाबतचा विकल्प दिला असता तर त्यांना जी सुधारित वेतनश्रेणी देय ठरली असती त्या वेतनश्रेणीच्या अनुषंगाने वाहतूक भत्ता विनियमित करण्यात येईल.

(पाच) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक टीआरए-१३७९/सीआर-१७३७/एसईआर-५, दिनांक २० फेब्रुवारी १९८० व त्यात वेळोवेळी केलेल्या सुधारणेनुसार, अंध व हातापायाच्या विकलांगतेसहित अस्थी व्यंगामुळे अधू असलेल्या सर्व राज्य शासकीय कायम आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांना (कार्यव्ययी आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांसह) विशेष वाहन भत्ता मंजूर करण्यात आलेला आहे. हे आदेश अंमलात आल्यानंतर सदर विशेष वाहन भत्ता बंद करण्यात यावा आणि त्याऐवजी अशा कर्मचाऱ्यांना या आदेशानुसार विहित करण्यात आलेल्या दराच्या दुप्पट दराने वाहतूक भत्ता प्रदान करण्यात यावा. तथापि, कर्तव्यस्थानापासून एक किलोमीटर अंतराच्या आत किंवा कर्तव्यस्थान व निवासस्थान यांचा एकत्र परिसर असेल अशा ठिकाणी राहणाऱ्या कर्मचाऱ्यांना हा भत्ता या आदेशानुसार सर्वसाधारण दराने अनुज्ञेय राहील. तसेच हा भत्ता ज्याना शासकीय वाहन पुरविलेले आहे त्यांना अनुज्ञेय असणार नाही.

३. रजा, प्रशिक्षण, दौरा इत्यादी कारणांमुळे ३० दिवसांपेक्षा जास्त अनुपस्थितीच्या कालावधीसाठी हा भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

४. शासन असाही आदेश देत आहे की, सर्व अनुदानप्राप्त शैक्षणिक संस्थांच्या प्राथमिक, माध्यमिक शाळांतील पूर्णकालिक शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी तसेच कृषि व कृषितर विद्यापीठातील व तत्संलग्न महाविद्यालयातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी त्याचप्रमाणे शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक मभवा-११८६/३९४/सेवा-१०, दिनांक १८ ऑगस्ट १९८६ मधील परिच्छेद ६ मध्ये उल्लेखिलेले इतर कर्मचारी ह्यांना सदरहू आदेश लागू असतील.

५. महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम, १९६१ (सन १९६२ चा अधिनियम क्रमांक ५) च्या कलम २४८ च्या परंतुकान्वये प्रदान केलेले अधिकार व त्या संबंधातील इतर सर्व अधिकार यांचा वापर करून शासन असाही आदेश देत आहे की, जिल्हा परिषदांच्या पूर्णकालिक कर्मचाऱ्यांनासुद्धा हे आदेश योग्य त्या फेरफारासह लागू करण्यात यावेत.

६. शासन असाही आदेश देत आहे की, विद्यापीठ अनुदान आयोगाच्या वेतनमानानुसार वेतन घेणाऱ्या शिक्षक कर्मचाऱ्यांनाही हे आदेश लागू करण्यात यावेत.

७. संबंधित विभागीय प्रमुखांनी सदरहू आदेश स्थानिक संस्थांच्या अणि सर्व संबंधित संस्थांच्या व्यवस्थापनांच्या निदर्शनास आणून द्यावेत. शासनाने वेळोवेळी मंजूर केलेल्या सहाय्यक अनुदान नियमांनुसार या भत्त्यासाठी सहाय्यक अनुदान अनुज्ञेय होईल असे त्यांनी व्यवस्थापनांना कळवावे.

८. शासकीय कर्मचाऱ्यांच्या बाबतीत वाहतूक भत्त्यावरील खर्च " मागणी क्रमांक जी-८-२०७०-इतर प्रशासकीय सेवा-८००, इतर खर्च–(सहा) वेतन, घरभाडे भत्ता व स्थानिक पूरक भत्ता यांच्यात सुधारणा झाल्यामुळे त्यासाठीची ठोक तरतूद " या शीर्षाखाली खर्ची घालण्यात यावा.

अनुदानप्राप्त संस्था व जिल्हा परिषदा यांच्या कर्मचाऱ्यांच्या बाबतीतील खर्च संबंधित प्रमुख लेखाशीर्षाखालील ज्या लेखाशीर्षाखाली त्यांच्या सहायक अनुदानाचा खर्च खर्ची घालण्यात येतो त्या उपलेखाशीर्षाखाली खर्ची घालण्यात यावा.

९. वाहतूक भत्ता संबंधीत कर्मचाऱ्याच्या वेतनासमवेत मासिक वेतन देयकात काढण्यात यावा.

१०. ह्या आदेशाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(श. वि. लागवणकर,)**
शासनाचे उप सचिव.

---

प्रति,

महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
महालेखापाल-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
राज्यपालांचे सचिव.
मुख्य मंत्र्यांचे अपर मुख्य सचिव.
उप मुख्य मंत्र्यांचे सचिव.
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक.
मंत्रालयीन सर्व विभाग.
सर्व विभागीय आयुक्त.
मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख.
*प्रबंधक, उच्च न्यायालय(मूळ शाखा), मुंबई.
*प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई.
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
*सहसंचालक, ऑल इंडिया इन्स्टिट्यूट ऑफ लोकल सेल्फ गव्हर्नमेंट, मुंबई.
शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई (२० प्रती).
ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई (२० प्रती).
नगरविकास विभाग, यूडी-१०, मंत्रालय, मुंबई (२० प्रती).
कृषि व पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास, मत्स्यव्यवसाय विभाग, (२० प्रती).
आदिवासी विकास विभाग (२० प्रती).
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधि हिशेब, मुंबई.
उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधि हिशेब, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती.
जिल्हा लेखापरीक्षा अधिकारी, स्थानिक निधि हिशेब, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर.
जिल्हा लेखापरीक्षा अधिकारी, स्थानिक निधि हिशेब, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी.
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी.
शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (२५ प्रती).
उच्च शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (२५ प्रती).
कला संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई (४० प्रती).
संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई (१०० प्रती).
संचालक, तांत्रिक प्रशिक्षण, द्वारा--तंत्र शिक्षण संचालक, मुंबई (२५० प्रती)
सिनियर रिसर्च ऑफिसर, पे रिसर्च युनीट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग), खोली क्र. २६१, नॉर्थ ब्लॉक नवी दिल्ली.
सर्व विभागीय शिक्षण उप संचालक (प्रत्येकी १० प्रती).
सर्व विभागीय तंत्र शिक्षण उप संचालक (प्रत्येकी १० प्रती).
सर्व जिल्हा परिषदांचे शिक्षणाधिकारी.
आयुक्त, महानगरपालिका, नागपूर.
प्रशासकीय अधिकारी, पश्चिम महाराष्ट्रातील नगरपालिका शिक्षण मंडळे (पुणे/कोल्हापूर/सोलापूर या महानगरपालिकांची शिक्षण मंडळे यांसह).
मुख्य अधिकारी, सर्व नगरपालिका.
कार्यकारी अधिकारी, कॅन्टोनमेंट बोर्ड, खडकी/देहू रोड/देवळाली/अहमदनगर
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
संचालक, आदिवासी कल्याण, महाराष्ट्र राज्य, नाशिक (१० प्रती).
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती).

संचालक, आदिवासी संशोधन व शिक्षण संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.

आदिवासी विकास आयुक्त, नाशिक.

सर्व विभागांतील समाजकल्याण अधिकारी.

अपर आयुक्त, आदिवासी उपयोजना, नाशिक/नागपूर.

सर्व समाजकल्याण अधिकारी, वर्ग-१.

सर्व आदिवासी कल्याण अधिकारी.

सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिकृत आदिवासी विकास प्रकल्प.

कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर.

कुलसचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी.

कुलसचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला.

कुलसचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी.

कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई.

कुलसचिव, पुणे विद्यापीठ, पुणे.

कुलसचिव, नागपूर विद्यापीठ, नागपूर.

कुलसचिव, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद.

कुलसचिव, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर.

कुलसचिव, अमरावती विद्यापीठ, अमरावती.

कुलसचिव, श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई.

कुलसचिव, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव.

अधीक्षक, वेतन पथक, सर्व जिल्हे.

शिक्षण निरीक्षक, बृहन्मुंबई (उत्तर, दक्षिण व पश्चिम विभाग).

सर्व कन्याशाळा निरीक्षिका.

सर्व जिल्ह्यांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण विभाग).

शिक्षण अधिकारी, बृहन्मुंबई महानगरपालिका.

संचालक, नगरपालिका प्रशासन, मुंबई.

सर्व प्रादेशिक संचालक, नगरपालिका प्रशासन.

वित्त विभागातील सर्व कार्यासने.

निवड फाईल, वित्त विभाग---सेवा-५.

---

* पत्राद्वारे

Grant of Transport Allowance to State Government employees and others.

# GOVERNMENT OF MAHARASHTRA
## FINANCE DEPARTMENT

Resolution No. वाहभ-1098/CR-83/98/SER-5

Mantralaya, Mumbai 400 032, dated 14th December 1998

*Read.*—(1) Govt. Resolution, F.D. No. TRA-1379/CR-1737/SER-5, dated the 20th February, 1980.

(2) G.R., F.D., No. TRA-1083/CR-1375/SER-5, dated the 4th January, 1984.

(3) G.R., F.D., No. TRA-1383/CR-1454/SER-5, dated the 10th January, 1984.

(4) G.R., F.D., No. SCA-1388/CR-680/SER-5, dated the 8th March. 1989.

(5) Govt. of India, Ministry of Finance, Department of Expenditure, Office Memorandum No. 21(1)/97/E.II(B), dated the 3rd October, 1997.

*RESOLUTION*

Under the orders quoted at Sr. No. 5 above, the Central Government have sanctioned Transport Allowance to its employees towards suitably compensating them for the cost incurred on account of commuting between the place of residence and the place of duty. The question of granting Transport Allowance to the State Government employees and others on the lines of the Central Government was under consideration of the Government for some time past. Government is now pleased to direct that **with effect from 1st October, 1998** the State Government employees and others shall be granted Transport Allowance as shown in the Table below :—

TABLE

| Pay scale of the Employee | Rate of Transport Allowance per month (in Rupees) | |
|---|---|---|
| | "A-1" and "A" Class City | Other places |
| 1. Employees drawing pay in the scale of Rs. 8,000—13,500 or above. | 800 | 400 |
| 2. Employees drawing pay in the scale of Rs. 6,500—10,500 or above but below the scale of Rs. 8,000—13,500. | 400 | 200 |
| 3. Employees drawing pay below the scale of Rs. 6,500—10,500. | 100 | 75 |

2. The grant of Transport allowance under these orders shall be regulated according to, and will be subject to the following conditions :—

(*i*) The cities referred to as ' A-1 ' and ' A ' in these orders shall be the same as those classified as such for the purpose of Compensatory Local Allowance.

(*ii*) The allowance shall not be admissible to those employees who are provided with Government accommodation within a distance of one kilometre or within a campus housing the places of work and residence.

*Note.*—The grant of the allowance under these orders would be subject to furnishing of a certificate by the employee that the Government accommodation is not located within one kilometer from the place of work of the concerned employee or within a campus housing the places of work and residence.

(*iii*) The allowance shall not be admissible to those employees who have been provided with the facility of Government transport.

(*iv*) In case of employees who have opted to draw pay in the pre-revised scales of pay, the transport allowance shall be regulated in accordance with the revised scales of pay to which such employees would have been entitled to, had they opted to come over to revised scales.

(*v*) Under the Government Resolution, Finance Department, No. TRA-1379/CR-1737/SER-5, dated the 20th February, 1980 as amended from time to time special conveyance allowance has been sanctioned to the blind and orthopaedically handicapped employees with disability of lower extremeties borne on regular establishment (including work charged staff), who generally require physical assistance for going to and coming from the place of their duty. Consequent upon coming into force of these orders, such conveyance allowance shall be abolished and instead all such employees may now be paid transport allowance at double the normal rates prescribed under these orders. In case however, such handicapped employees have been provided with Government accommodation within a distance of one kilometre from the place of work or within a campus housing the places of work and residence, the allowance should be paid at normal rates as applicable under these orders. The allowance shall not be admissible in case such employees have been provided with the facility of Government transport.

3. This allowance will not be admissible during absence from duty exceeding 30 days due to leave, training, tour etc.

4. Government is also pleased to direct that the Transport Allowance shall also be admissible to full-time teaching and non-teaching staff of primary, secondary schools of aided educational institutions and teaching and non-teaching staff of agricultural and non-agricultural Universities and affiliated colleges and other employees mentioned in para. 6 of Government Resolution, Finance Department, No. मभवा-1186/394/SER-10, dated 18th August 1986.

5. In exercise of the powers conferred by the proviso to Article 248 of the Maharashtra Zilla Parishads and Panchayat Samitis Act, 1961 (Mah. V of 1962) and all other powers enabling it in that behalf, Government is also pleased to direct that these orders should also be made applicable *mutatis-mutandis* to the full-time Zilla Parishad employees.

6. Government is also pleased to direct that these orders should also be made applicable to the teaching staff drawing pay in the U.G.C. scales of pay.

7. The concerned Heads of Department should bring these orders to the notice of local bodies and managements of institutions concerned. They should inform the managements that the grant-in-aid for this allowance will be admissible in accordance with the rules for grant-in-aid sanctioned by Government from time-to-time.

8. The expenditure on account of the Transport Allowance should be debited to " Demand No. G-8-2070-Other Administrative Services---800-Other Expenditure-(VI) lumpsum provision on account of revision of pay, house rent allowance and compensatory local allowance."

In respect of employees of aided institutions and Zilla Parishads, the expenditure should debited to the sub-heads of account under the respective major heads to which expenditure on grant-in-aid to them is debited.

9. The allowance should be drawn along with the pay of the concerned employee in the monthly salary bill.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

S. V. LAGWANKAR,

Deputy Secretary to Government.